**डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटींकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण व उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोप निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती (२४०६ ८६१३) लेखाशीर्षाअंतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सावंवि-२०२१/प्र.क्र.२३/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक : १०.०३.२०२२**

वाचा:-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि.६.४.२०२१
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि.२४.६.२०२१
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२७/६९/२०२१-२२, दिनांक १५.६.२०२१.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक,(अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/असं/प्र.क्र.०९/२०२१-२२/१७०, दिनांक ६.०८.२०२१.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक,(अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/असं/प्र.क्र.०८/२०२१-२२/२६४, दिनांक ३०.०९.२०२१.
६) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. सावंवि-२०२१/प्र.क्र.२३/फ-११ दि. ६.०७.२०२१.
७) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. सावंवि-२०२१/प्र.क्र.२३/फ-११ दि. ७.१०.२०२१.
८) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१.
९) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. सावंवि-२०२१/प्र.क्र.२३/फ-११ दि. १३.०१.२०२१.
१०) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि. २८.०१.२०२२.
११) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२७/५९९/२०२१-२२, दिनांक २१.०२.२०२२.

**प्रस्तावना :-**

सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरिता सामाजिक वनीकरणांतर्गत डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण व उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोप निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती (२४०६ ८६१३) या योजनेंतर्गत सन २०२१-२२ करिता ५०-इतर खर्च अंतर्गत या उदिष्टांतर्गत रू.१०००.०० लक्ष इतका नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

२. कोविड-१९ च्या महामारीमुळे सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात होणाऱ्या अर्थव्यवस्थेवरील परिणामाबाबत वित्तीय उपाययोजना, शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २४.६.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. सदर शासन निर्णयानुसार सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय निधीच्या ६० टक्के निधी उपलब्ध होईल या सूत्राच्या अधिन राहून विभागाने नियोजन करावयाचे आहे. सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये विभागातील योजनांकरिताचा नियतव्यय ६० टक्केच्या मर्यादेत निश्चित करून, त्याबाबतचा तपशील सादर केलेला आहे. त्यानुसार

सन २०२१-२२ करीता डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण व उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोप निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती (२४०६ ८६१३) या योजनेसाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रू. १०००.०० लक्ष या नियतव्ययापैकी ६०% च्या मर्यादेत ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत रू. ३५०.०० लक्ष नियतव्यय निश्चित केलेला आहे.

३. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १, २, ८ व १० चे परिपत्रक व शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ९ महिन्यांच्या कालावधीसाठी (डिसेंबर, २०२१ पर्यंत) अनिवार्य खर्चाच्या निधी वितरण/खर्चाची मर्यादा ७५ % इतकी विहीत करण्यात आली आहे. मात्र २१-पुरवठा व सामूग्री, २६-जाहिरात व प्रसिध्दी, ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर), ३२-अंशदाने व ३३-अर्थसहाय या बाबींसाठी वित्त विभागाची मान्यता घेणे आवश्यक राहील. तसेच कार्यक्रम खर्चासाठी ५०% इतक्या मर्यादेत निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. मात्र कार्यक्रम खर्चाची वर्ष अखेरची मर्यादा ६०% इतकीच राहील, असे नमूद केले आहे.

४. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र ३ च्या पत्रान्वये सदर योजनेंतर्गत रू. १००६.३४ लक्ष रकमेचा चालू बाब प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार शासन निर्णय दि. ६.०७.२०२१, दि. ७.१०.२०२१ व दि. १३.०१.२०२२ अन्वये सदर योजनेंतर्गत ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत अनुक्रमे रु. १००.०० लक्ष, रु. १५०.०० लक्ष व रु. ५४.६८४ लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर यांचे दिनांक २१.०२.२०२२ च्या पत्रान्वये सदर योजनेंतर्गत ६०% च्या मर्यादेत उर्वरित रु. ४५.३१६ लक्ष निधी ची आवश्यकता असल्याचे कळविले आहे. सबब, सदर योजनेंतर्गत ६० टक्केच्या मर्यादेत निश्चित करण्यात आलेल्या रु. ३५०.०० लक्ष नियतव्ययापैकी उर्वरित रु. ४५.३१६ लक्ष निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय :-</u>

सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण व उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोप निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती (२४०६ ८६१३) या योजनेंतर्गत ५०- इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत रू. ४५.३१६ लक्ष निधी वितरित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी. सदर योजनेतंर्गत प्रस्तावित कामांना तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी देण्यात आली असल्याची खात्री करूनच निधी वितरित करण्यात यावा.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), हे वर्ष २०२१-२२ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

४. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२१-२२ करिता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळता केला नसल्याची खात्री करावी.

५. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १, २, ८ व १० येथील शासन परिपत्रक/ निर्णयातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

६. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

७. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणीक्र.सी-७,**

**२४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनांतर्गत)**

**(०३) (०४) डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे बळकटीकरण व आधुनिकीकरण व उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपे निर्मितीसाठी जिल्हा व तालुकास्तरावर रोपवाटीका निर्मिती"(२४०६ ८६१३) ५० - इतर खर्च**

८. सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक १, २, ८ व १० येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक/शासन निर्णयानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३१०१२५२४४७५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=Personal, pseudonym=bb348b74c34d5cdc104457bb077cbbab2753fda9961368879 3f8ffb2d4595af5, 2.5.4.20=d399ba42648ff6007bc88b201ae47aa7d8a80a09e22cffd4c08887e 4e01ce080, postalCode=416519, st=MAHARASHTRA, serialNumber=b752370b557d0a3e58b4b069230bc54f6a13d04798d2ee7a 3f1c7dcc5655271c, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2022.03.10 12:53:30 +05'30'

**(डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वनसंरक्षक ( मंत्रालय)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.

४. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )
६. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/ विभागीय वन अधिकारी (प्रा)/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा)
७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )
८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६. निवडनस्ती फ-११